केंद्र शासन पुरस्कृत ए.एन.एम. आणि जी.एन.एम.नर्सिंग स्कूलच्या बळकटीकरणासाठी ३२ आसनी नॉन एसी बसेसच्या प्रस्तावित खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बसेस-२०२२/प्र.क्र.८२२ /सेवा-५**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

**दिनांक: ०७ ऑगस्ट, २०२४**

**वाचा :-**

१. संचालक, आरोग्य सेवा-२, संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष१११/-III/३२ आसनी नॉन एसी बसेस/सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत/१९०३-०८/२०२३, दि.२१.०२.२०२३
२. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.बसेस-२०२२/प्र.क्र.८२२/सेवा-५, दि.१०.०७.२०२३
३. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांचे पत्र क्र.संआसे-२/कक्ष परिवहन/केंद्र शासनाकडून उपलब्ध अनुदानामधू/१० नग ३२ आसनी नॉन एसी/सुधारीत /प्र.मा./५७२९-३४/२०२४, दि.१५.०३.२०२४.
४. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.बसेस-२०२२/प्र.क्र.८२२/सेवा-५, दि.१५.०३.२०२४
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांचे पत्र क्र.आसेप कक्ष ११८-१/३२ आसनी नॉन एसी बस/सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत/११७८८-९३/२०२४, दि.०१.०८.२०२४

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील ए.एन.एम.व जी एन एम परिचर्या प्रशिक्षण केंद्राच्या बळकटीकरणसाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेल्या अनुदानामधून १० नग ३२ आसनी नॉन एसी बसेस खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सं.क्र.१ अन्वये शासनास प्राप्त झाला होता. त्यानुषंगाने १० नग ३२ आसनी नॉन एसी बसेस खरेदी करण्याकरीता रु.१,८४,००,०००/- इतक्या रक्कमेच्या खर्चास संदर्भाधीन क्र.२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांच्या कार्यालय स्तरावरुन सदर खरेदी करीता निविदा प्रक्रिया राबविण्यात आली असता सदर निविदा प्रक्रियेत प्राप्त किमान दर प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक असल्याने रु.२,८८,५०००/- इतक्या खर्चाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती संदर्भाधिन क्र.३ अन्वये करण्यात आली होती. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, प्रशासकीय मान्यतेची वैधता संपुष्टात येत असल्याने तसेच केंद्र शासनाकडून प्राप्त निधीच्या मर्यादेत ७ वाहने खरेदी करणे शक्य होणार असल्याने सदर वाहन खरेदीकरीता नव्याने प्रशासकीय मान्यता मिळण्याची

विनंती संदर्भाधीन क्र.५ अन्वये करण्यात आली आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त निधीच्या मर्यादेत ३२ आसनी ०७ नॉन एसी बसेस खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील ए. एन. एम. व जी एन एम परिचर्या प्रशिक्षण केंद्राच्या बळकटीकरणासाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेल्या अनुदानामधून ०७ नग ३२ आसनी नॉन एसी बसेस खरेदी करण्यासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त निधीच्या मर्यादेत एकूण रु.१,८४,००,०००/- (अक्षरी रु. एक कोटी चौऱ्याऐंशी लक्ष फक्त) इतक्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती : -**

१) ज्या परिचर्या प्रशिक्षण केंद्राकडे वाहन व्यवस्था उपलब्ध नाहीत अशा परिचर्या प्रशिक्षण केंद्रांना प्राथम्याने वाहन उपलब्ध होतील याची खातरजमा उपसंचालक आरोग्य सेवा (शुश्रूषा), मुं. यांनी करावी व खरेदी पश्चात वाहन वाटपाचे आदेश निर्गमित करावेत.

२) सदर साहित्य सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) सदरहू साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे, शासन निर्णय (१) क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६ आणि (२) क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग४, दि.२४ ऑगस्ट, २०१७ यामधील तरतूदीप्रमाणे विहित कार्यपध्दतीनुसार खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेले दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

**खरेदी करावयाच्या बसेचचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-**

| वाहन | एकूण नग | एकूण किंमत |
|---|---|---|
| ३२ आसनी नॉन एसी बसेस (३१+CD+C) | ०७ | रु.१,८४,००,०००/- |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०८०७१५१५४८४११७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a65565e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC46960639B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2024.08.07 16:35:26 +05'30'

(अनिल कुमेरीये )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
६. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे.
७. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
९. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (अर्थसंकल्प/लेखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती,सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-५).